





**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दुरध्वनी क्र ०२२-२२७९३६१८** Email Id : GAD__१२A@maharashtra.gov.in

---

क्रमांक : विप्रप्र २०२५/प्र.क्र.२४/प्रशि-४ दिनांक : ०९ एप्रिल, २०२५.

प्रति,
सह/उपसचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय,मुंबई.

विषय : विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक या प्रशिक्षण संस्थेतील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत

संदर्भ : १. सा.प्र.वि.शा.नि.क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.०९.२०११
२. सा.प्र.वि.शा.नि.क्र.यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दि.११.०५.२०१५
३. सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६
४. सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दि.१६.०२.२०२१८

महोदय/महोदया,

विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक या संस्थेमध्ये गट-ब व गट-क संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना प्रशासकीय कामकाजाचे प्रशिक्षण दिले जाते. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई क्र. यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दि.११ मे, २०१५ मध्ये नमुद केलेली पदे भरण्याची कार्यपध्दती व प्रतिनियुक्तीने भरण्यात येणाऱ्या पदांच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या विहित केल्या आहेत.

त्यास अनुसरुन शासन सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई या विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक (नाशिक महसुल प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक) या संस्थेतील खालील नमुद करण्यात आलेल्या रिक्त पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी शासन सेवेत कार्यरत असणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून विहीत नमुन्यात अर्ज मागविण्यात येत आहेत. पदांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | पदनाम | | गट | रिक्त पदे | पदांची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | संचालक वर्ग-१ | | अ | ०१ | एस-२५ (७८८००-२०९२००) |
| २ | सहायक प्राध्यापक वर्ग-१ | | अ | ०७ | एस-१९ (५५१००-१७५१००) |
| | १ | लोकप्रशासन व कायदे अंमलबजावणी किंवा महसूल विभागाच्या विषयाशी संबंधित- २ पदे | | | |
| | २ | ग्राम विकासाशी संबंधित-१ पद | | | |
| | ३ | समाज कल्याण व आदिवासी विकास संबंधित-१ पद | | | |
| | ४ | नागरी विकास संबंधित-१ पद | | | |
| | ५ | अभियांत्रिकी व आरोग्य सेवेसंबंधित -१ पद | | | |
| | ६ | वित्त विषयक बाबींसंबंधीत- १ पद | | | |
| ३ | ग्रंथपाल | | क | ०१ | एस-८ (२५५००-८११००) |
| | एकूण | | | ०९ | |

**टिप :-** वरिलप्रमाणे वेतन संरचनेतील अधिकारी / कर्मचारी उपलब्ध न झाल्यास प्रचलित शासन निर्णयानुसार अर्जाचा विचार करण्यात येईल.

१. स्वियेत्तर सेवेअंतर्गत प्रतिनियुक्तीने येणाऱ्या इच्छुकांनी जाहिरातीत दिलेल्या पदांकरिता सोबत जोडलेल्या विहीत नमुन्यातील अर्ज संगणकावर टंकलिखित करुन दि.२९.०४.२०२५ पर्यंत कार्यालयीन वेळेत खालील पत्त्यावर पोस्टाद्वारे किंवा समक्ष सादर करावे.

२. स्वियेत्तर सेवेअंतर्गत प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी अर्ज सादर करणारे अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांचा अर्ज सादर करताना अर्जासोबत शासन सेवेत सध्या कार्यरत असल्याचे कार्यालय प्रमुखांच्या स्वाक्षरीचे प्रमाणपत्र सोबत जोडावे. शासन सेवेत कार्यरत नसलेल्या व्यक्तींनी अर्ज करु नये.

३. साप्रवि शा.नि.क्र.एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/कार्यासन-१२,दि.१७.१२.२०१६ व शा.नि.सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२,दि.१६.०२.२०१८ नुसार प्रतिनियुक्तीकरिता शासनाने निर्धारित केलेल्या अटी व शर्ती लागू राहतील. त्यानुसार अर्जाचा विचार केला जाईल.

४. कोणतीही विभागीय चौकशी प्रलंबित नसल्याचे स्वसाक्षांकित प्रमाणपत्र अर्जासोबत जोडावे.

५. अंतिम दिनांकापर्यंत प्राप्त झालेल्या अर्जाची छाननी करण्यात येऊन पात्र असणारे अधिकारी/कर्मचारी यांच्या मूळ अर्जाची छाननी करण्यात येईल. पात्र आणि निवड झालेल्या उमेदवारांचे प्रस्ताव पुढील कार्यवाहीसाठी सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन यांचेकडे नियुक्तीसाठीच्या पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात येतील.

६. संस्थेमध्ये स्वियेत्तर सेवेअंतर्गत प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेसाठी सादर करावयाच्या अर्जाचा नमुना सोबत जोडला आहे.

७. विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक या संस्थेने सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात वेळोवेळी काढलेल्या जाहिरातींच्या अनुषंगाने, ज्या उमेदवारांनी यापूर्वी अर्ज सादर केलेले आहेत. त्या अर्जदारांच्या अर्जाच्या अनुषंगाने शासनाने मान्यता दिलेली नसल्यामुळे सदर उमेदवारांनी पुन्हा अर्ज सादर करु नये.

८. अर्ज विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक (नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी,नाशिक) विभागीय आयुक्त कार्यालय आवार, नाशिक रोड- ४२२१०१ या पत्त्यावर पाठवावेत.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४०९१२४९१३६८०७ हा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**आपली,**

NAMRATA SHASHANK BHARSAKHALE

Digitally signed by NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
DN: CN = NAMRATA SHASHANK BHARSAKHALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2025.04.09 12:51:12 +05'30'

**(नम्रता भारसाखळे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक
२. निवडनस्ती- प्रशि-४

प्रति,

मा. विभागीय आयुक्त, नाशिक,
निवड समिती, नाशिक.

| कोणत्या पदासाठी अर्ज केला आहे ते पद | ----- |
|---|---|

१) स्वत:ची माहिती

नाव (डॉ.श्री/श्रीमती/कु.)

(आडनांव) (स्वत:चे नांव) (वडिलांचे नांव)

जन्मतारीख : बय :-

राष्ट्रीयत्व : अधिवास :-

जात :- प्रवर्ग :-

लिंग :- अविवाहीत/विवाहीत :- अपत्यांची संख्या :-

---

पत्ता :- --------

दुरध्वनी क्र. :- -- भ्रमणध्वनी क्र.:- ----

स्थानिक पत्ता :- ---

ईमेल :---

| मुळ विभाग | सध्याचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|
| | | |

(२) शैक्षणिक पात्रता :-

| उत्तीर्ण परीक्षा | शाळेचे /महाविद्यालयोच नांव व पत्ता | विभाग/विद्यापिठ | उत्तीर्ण वर्ष | विषय | वर्ग/श्रेणी | गुणांची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

(३) पुर्वानुभव :- (सध्याचे पदाआगेदरचे अनुभव लिहावे)

| नांव | कार्यालयाचे नांव | सेवेचा कालावधी/ वर्ष | काम केलेले पद | कामाचे स्वरुप |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

(४) परिविक्षाधिन कालावधी :-

| शासकीय सेवेत प्रवेश केल्याचा दिनांक | परिविक्षाधिन कालावधी असल्यास एकूण कालावधी (महिने व वर्ष) | परिविक्षाधिन कालावधी पुर्ण केलेचा आदेश क्रमांक व दिनांक |
|---|---|---|
| | | |

(५)प्रतिनियुक्तीचा तपशील (यापुर्वीच्या सर्व प्रतिनियुक्तींचा तपशील सादर करावा)

| प्रतिनियुक्तीचा कालावधी (दिनांकामध्ये नमूद करावा) | | ज्या कार्यालयात प्रतिनियुक्ती देण्यात आली त्या कार्यालयाचा तपशील | ज्या पदासाठी प्रतिनियुक्ती देण्यात आली ते पदनाम व संवर्ग |
|---|---|---|---|
| पासून | पर्यंत | | |
| | | | |

(६) (घोषित केलेले स्वग्राम (जिल्हा व तालुका) :-

(७) महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ अंतर्गत विभागीय चौकशी सुरु आहे किंवा कसे? त्याचा तपशिल :-

(८) सरळसेवेने तसेच पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप झालेले असल्यास त्यासंबंधीचा तपशिल :-

सरळसेवेने –

पदोन्नतीने –

(९) विशेष कार्य :-

प्रकाशने (पुस्तके आणि लेख) :- --

पुरस्कार आणि शिष्यवृत्ती :-

५.इतर कामगिरी :- --

(६)

| कोर्सचे नांव | संस्थेचे नांव | वर्ष | गुण | श्रेणी |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

(७) आपल्याला अवगत भाषेचा दर्जा लिहा :-

| भाषा | मराठी | इंग्रजी | हिंदी | इतर |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |
| | | | | |

**(१०) १. संदर्भ :-**

नांव :- श्री ------

पत्ता :- -------

दुरध्वनी क्रमांक:- ---------

ई-मेल :--------------

---

**२. संदर्भ :-**

नांव :- श्री.---------------

पत्ता :- ------------

दुरध्वनी क्रमांक:- ------------------

ई-मेल :- ----------------------

---

वर दिलेली माहिती योग्य असून त्यात काही तफावत आढळल्यास कायदेशीर कारवाईस मी संपूर्णपणे पात्र असेल.

दिनांक :- / /2022

अर्जदाराची सही

स्थळ :- अर्जदाराचे नाव :-